**शालेय पोषण आहार योजनेंतर्गत पात्र शाळांना गॅस कनेक्शन उपलब्ध करुन देण्यासाठी इंडियन ऑईल कॉर्पोरेशन लिमिटेड या संस्थेचा समावेश करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः शापोआ- २०२०/प्र.क्र.१४/एस.डी.३**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक: २९ डिसेंबर, २०२१

**वाचा:-**

१) केंद्र शासनाचे आदेश क्र.F.No.३-१/२०१२/Desk (MDM), दि.२६/०३/२०१३.
२) केंद्र शासनाचे आदेश क्र. F.No.३-१/२०१४/Desk (MDM), दि.१९/०८/२०१४.
३) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रिडा विभाग क्र. शापोआ-२११३/प्र.क्र.१९९/वि.वि. -३, दि.१७/०३/२०१५.
४) शिक्षण संचालक (प्राथ.), महाराष्ट्र राज्य, पुणे यांचा प्रस्ताव क्र.शापोआ/ एलपीजी / २०२१/ ११९३, दि.१५/०९/२०२१.
५) आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय क्र.आविवि-२०१५/प्र.क्र.१०७ (भाग२)/ कार्यासन-८, दि.१०/११/२०१६.
६) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रिडा विभाग क्र. शापोआ-२०२०/प्र.क्र.१४/एस.डी -३, दि.२५/११/२०२१.

**प्रस्तावना:-**

शालेय पोषण आहार योजनेंतर्गत राज्यातील पात्र असलेल्या सर्व शाळांपैकी केंद्रीय स्वयंपाकगृह प्रणालीमार्फत आहार पुरविण्यात येणाऱ्या शाळा व सद्यस्थितीत गॅस कनेक्शन उपलब्ध असलेल्या शाळा वगळून उर्वरित शाळांना हिंदुस्थान पेट्रोलियम कॉर्पोरेशन लि. (HPCL) व भारत पेट्रोलियम कॉर्पोरेशन लि. (BPCL) या संस्थांव्दारे गॅस कनेक्शन उपलब्ध करुन देण्याबाबतचा शासन निर्णय संदर्भाधिन दि.२५ नोव्हेंबर,२०२१ रोजी निर्गमित केला आहे. सदर शासन निर्णयाच्या अनुषंगाने इंडियन ऑइल कॉर्पोरेशन लि. (IOCL) या केंद्र शासनाच्या संस्थेने दि.२५ नोव्हेंबर, २०२१ रोजी निर्गमित केलेल्या शासन निर्णयातील परिशिष्ट १ मध्ये नमूद केलेले दर तसेच, अटी व शर्तीनुसार गॅस कनेक्शन उपलब्ध करुन देण्याची तयारी दर्शविली आहे. त्यानुषंगाने शासन निर्णय दि.२५ नोव्हेंबर, २०२१ मध्ये नमूद हिंदुस्थान पेट्रोलियम कॉर्पोरेशन लि. (HPCL) व भारत पेट्रोलियम कॉर्पोरेशन लि. (BPCL) या संस्थांबरोबर इंडियन ऑइल कॉर्पोरेशन लि. (IOCL) या संस्थेलाही पात्र शाळांना गॅस कनेक्शन उपलब्ध करुन देण्याकरीता मान्यता देण्याची बाब शासन स्तरावर विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

उपरोक्त नमूद विषयाच्या अनुषंगाने खालीलप्रमाणे शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

i. शासन निर्णय दि.२५ नोव्हेंबर, २०२१ मध्ये नमूद हिंदुस्थान पेट्रोलियम कॉर्पोरेशन लि. (HPCL) व भारत पेट्रोलियम कॉर्पोरेशन लि. (BPCL) या संस्थांबरोबर इंडियन ऑइल कॉर्पोरेशन लि. (IOCL) या संस्थेलाही शालेय पोषण आहार योजनेंतर्गत पात्र असलेल्या सर्व शाळांपैकी केंद्रीय स्वयंपाकगृह प्रणालीमार्फत आहार पुरविण्यात येणाऱ्या शाळा व सद्यस्थितीत गॅस कनेक्शन

उपलब्ध असलेल्या शाळा वगळून उर्वरित शाळांना गॅस कनेक्शन उपलब्ध करुन देण्यास मान्यता देण्यात येत आहे.

ii. शासन निर्णय दि.२५ नोव्हेंबर, २०२१ मध्ये नमूद गॅस कनेक्शन उपलब्ध करुन देण्याचे दर तसेच इतर अटी व शर्ती कायम राहतील व त्यांचे तंतोतंत पालन संबंधित संस्थांनी करणे आवश्यक राहील.

२. प्रस्तुत शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२११२२९१७४५५६७९२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RAJENDRA SHANKARRAO PAWAR

Digitally signed by RAJENDRA SHANKARRAO PAWAR
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=SCHOOL EDUCATION & SPORT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=679184b88f7019ef64ad6ddc2495ca280267c0d4755ce63fa70c45cf755d9373, serialNumber=01d5ac9d227fcf738d4d5a366976c83175db4f058411807fb1031c17dd155677, cn=RAJENDRA SHANKARRAO PAWAR
Date: 2021.12.29 17:47:24 +05'30'

**( राजेंद्र पवार )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई
२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३) मा. मंत्री, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई
४) सर्व मा. मंत्री/ मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५) मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा/विधानपरिषद, विधानमंडळ, मुंबई
६) सर्व मा. संसद सदस्य/ विधानसभा सदस्य/विधानपरिषद सदस्य
७) मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
८) मा. अपर मुख्य सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
९) आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे
१०) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
११) शिक्षण संचालक (माध्य. व उच्च माध्य.), महाराष्ट्र राज्य, पुणे
१२) शिक्षण संचालक (प्राथ.), महाराष्ट्र राज्य, पुणे
१३) शिक्षणाधिकारी (प्राथ.), जिल्हा परिषद (सर्व)
१४) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
१५) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र ½ , मुंबई/नागपूर
१६) वित्त विभाग (व्यय-५), मंत्रालय, मुंबई
१७) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग (अर्थसंकल्प), मंत्रालय, मुंबई
१८) निवड नस्ती - एस.डी. ३.